महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद या कार्यालयास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील अनुदान वितरित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः बियुडी २०२२/प्र.क्र.१३/का-४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २४.०१.२०२२.

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं- २०२१/प्रक्र. ४८/अर्थ-३, दि.६ एप्रिल, २०२१
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२९.०७.२०२१.
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ यांचे पत्र, क्रमांक: MSBW/Est/Reg.Sr.No.३१/४१९/२०२२, दि.११.०१.२०२२.

## प्रस्तावना :

महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद या कार्यालयास सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद या कार्यालयासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात रु.१९,२५,०००/- (रुपये एकोणीस लाख पंचवीस हजार मात्र) इतके अनिवार्य खर्चासाठी अनुदान मंजूर करण्यात आले आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ यांनी त्यांच्या संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळासाठी अनुदान वितरित करण्यासाठी मागणी केल्यानुसार वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ ते ४ येथील परिपत्रक/शासन निर्णयावान्वये प्राप्त मान्यता तसेच अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या मर्यादेत खाली दर्शविलेल्या विवरणाप्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद यांच्याकडे “०१ वेतन” आणि “२४ पेट्रोल तेल व वंगण” या उद्दीष्टासाठी रु.९,९५,२५०/- (रुपये नऊ लाख पंचाण्णव हजार दोनशे पन्नास फक्त) इतका निधी सुपूर्द करण्यात येत आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद यांनी खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी. तसेच वितरित अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र विभागास तसेच महालेखाकार कार्यालयास सादर करावे .

| “मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००)(०१), आयुक्त (००) (०२) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, आस्थापना खर्च (२०५३१२६७) अनिवार्य” | | | | |
|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **लेखाशिर्ष तपशीलवार** | **सन २०२१-२२ साठी अर्थसंकल्पीय अंदाज** | **वितरणासाठी उपलब्ध अनुदान** | **वितरीत करावयाचे अनुदान** |
| १ | ०१ वेतन | १७,१७,०००/- | १०,३०,२००/- | ९,६०,०००/- |
| २ | २४ पेट्रोल तेल व वंगण | ४७,०००/- | ३५,२५०/- | ३५,२५०/- |
| | एकूण | **१७,६४,०००/-** | **१०,६५,४५०/-** | **९,९५,२५०/-** |

२. वरीलप्रमाणे अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करतांना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करणे ही जबाबदारी महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळाची राहील.

३. उपरोक्त खर्च “मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००)(१०१), आयुक्त (००)(०२) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, आस्थापना खर्च (२०५३१२६७) अनिवार्य” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं- २०२१/प्रक्र. ४८/ अर्थ-३, दि.६ एप्रिल, २०२१, शासन निर्णय, वित्त विभाग, अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.२९.०७.२०२१ आणि अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१ अन्वये प्राप्त प्राधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२४१२४७५४३५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minority Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2fde30534317da1ea9bdb3e7bec3c1084d5d608a86e993f8ac0fa02331b77751, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2022.01.24 13:21:41 +05'30'

**(सं.छ.तडवी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद,
२. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
३. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
५. कार्यासन अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. निवडनस्ती/कार्यासन-४ संग्रहार्थ.